**सर्वसाधारण बदल्या-२०२५**
**उप अभियंता (स्थापत्य)**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांक: एलटीएस-२०२५/प्र.क्र.६०/सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक :३०/०५/२०२५**

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने सार्वजनिक बांधकाम विभागातील उप अभियंता (स्थापत्य) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | उप अभियंता (स्थापत्य) यांचे नांव | सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नांव | बदलीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १. | श्री. महेश प्रतापसिंह परदेशी, उप विभागीय अधिकारी | जिल्हा परिषद (बांध.) उप विभाग, जुन्नर-आंबेगाव. | उप अभियंता, संकल्पचित्र इमारती घटक विभाग, पुणे येथील रिक्त पदी. |
| २. | श्री. अनिल जगन्नाथ बडे, उप विभागीय अभियंता | सार्वजनिक बांधकाम उप विभाग, दोडामार्ग, जि.सिंधुदुर्ग. | सार्वजनिक बांधधकाम उप विभाग क्र.१,पुणे या रिक्त पदी. |
| ३. | श्रीम.सिमा यशवंत गोवेकर, उप विभागीय अधिकारी | उप कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,सावंतवाडी. | सार्वजनिक बांधकाम उप विभाग, दोडामार्ग, जि.सिंधुदुर्ग या श्री. बडे यांच्या नियतकालीक बदलीने रिक्त होणा-या पदी. |

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी उपरोक्त उप अभियंता (स्थापत्य) यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

३. उपरोक्त उप अभियंता(स्थापत्य) यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब शासनास सादर करावा. उपरोक्त अभियंत्यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, बदली झालेल्या अभियंत्यांनी बदलीच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी, अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी

हा अकार्यदिन (**dies non**) म्हणून गणला जाईल. तसेच त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदली करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

४. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी पदभार सोडल्याचा व स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणे करुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत/ मंजूर करु नयेत.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२५०५३०१८१६०६१६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2025.05.30 18:17:02 +05'30'

**(द.व.खारके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर
२. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
३. संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
४. अधिदान व लेखाधिकारी/निवासी लेखापरिक्षा अधिकारी वांद्रे,मुंबई
५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
६. संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ
७. अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र (पूल व इमारत) घटक मंडळ कोकण भवन, नवी मुंबई
८. मा. मंत्री (सा.बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री (सा.बां.) (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मा. राज्यमंत्री (सा.बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. मा. राज्यमंत्री (सा.बां.) (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. संबंधित उप अभियंता यांना संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, यांच्यामार्फत.
१३. अपर मुख्य सचिव (सा.बां.)/सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
१४. कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.